


# शुन्य

नेटअक्षरी

ई-साहित्य प्रतिष्ठान
वर्ष तिसरे, अंक ५,
३१ जानेवारी २०११

संपादक

सचिन काकडे (मुंबई)

अतिथी संपादक

अभिषेक प्रभुदेसाई (इचलकरंजी)

सह संपादक

सोनाली घाटपांडे (पुणे)

भारती सरमळकर (मुंबई)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

# संपादकिय......

नमस्कार मित्रहो...!!!
आदि नंतर अंत
हे जाणता भगवंत. .अन,
तयाचा संत
हाच तो 'शुन्य'
त्याचं अस्तित्व. . .
त्याची तत्व. . .
त्यातलं सत्व, . . .
देव-दानव, ग्रह -तारे
प्राणी-मानव, सर्व-सारे
नजर -भावना, ज्ञान-अज्ञान
आचार-विचार-शास्त्र विज्ञान
अगदी. . .!!
पाप आणि पुण्य
सगळंच "शुन्य"
हेच शुन्य. . .
अस्तित्वासाठिच प्रदक्षिणा घालतय. . .
गोलाकार शुन्यातली. . .
शुन्यातुन . . .शुन्याकडे. . .
म्हणुनच . . .

जे कळेल ते शुन्य नाही कळले तर शुन्य...

## सचिन काकडे

संपादक - मुंबई



# अतिथी संपादकाची ओळख

नमस्कार !!

मी अभिषेक मुकुंद प्रभुदेसाई . B Sc Physics, जन्म कापड उद्योगासाठी प्रसिध्द असलेलं आणि महाराष्ट्राचं Manchester म्हणुन ओळखलं जाणा-या "इचलकरंजी" या गावचा. माझा इचलकरंजीत Textile Chemicals चा व्यवसाय आहे. मी आयुष्यात पहिलं काय वाचलं ते आठवत नाही (बहुधा पु.ल. असावेत) साहित्याची आवड तशी लहानपणापासुन आहे पु.ल. तर पाठ आहेत . जर पु. ल. सारख्या व्यक्तीने लिहिलेच नसते तर आज मी बोलु, वाचु, आणि लिहुही शकलो नसतो. मी ठरवुन असं कधी लिहिलं नाही गरवारेला असताना फ्रेशर्स पार्टीत नाचायला सांगितलं पण मी त्या ऐवजी कविता ऐकवली ती पोरांना इतकी आवडली कि काव्यवाचनाच्या दिवशी सगळयांनी वन्स मोअर वर वन्स मोअर दिले शेवटी मास्तरांनी कंटाळुन सांगितलं की "याचा आपण स्वतंत्र कार्यक्रम ठेवु" त्यावेळी कळालं कि आपण लिहु शकतो जे लोकांपर्यंत सहज पोहोचु शकतं. याच दरम्यान "मराठी कविता" ही कम्युनीटी चालु झाली आणि मी तिचा सदस्य झालो अगदी सुरुवातीपासुनचा सदस्य असलो तरी खरा तिच्याशी जुळलो ते या वर्षभरातच। इतके दिवस लांब रहाण्याचं कारण म्हणजे आधी मला वाटत नव्हतं कि हे लोक एव्हढं मोठ्ठ आणि प्रामाणिक काम करत असतील. तेव्हा वाटायचं हे एकमेकांना पार्टीत भेटत असतील चार कविता वाचतील आणि सोडुन देतील. . पण आज मराठी कविता जवळपास ई-मेलवर एक लाख लोकांपर्यंत हे लोक "नेटाक्षरी"च्या माध्यमामधून पोहोचवत आहेत हे पाहुन या प्रामाणिक नेटक-यांच्या पासुन इतके दिवस उगाच लांब राहिल्याचं दुःख आहे. ८४ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात त्यांनी घेतलेले कष्ट "काव्यजागर" आणि "अक्षर अंगण"सारखे उपक्रम हे खरंच पुरस्कार देण्याजोगे आहेत. आज मला खुप गर्व आहे कि मी या उपक्रमात सहभागी झालो आहे अजुन एक कि जे सहभागी झाले नाही त्यांना अजुनही वेळ आहे नंतर रांगेत उभे रहावे लागेल त्यापेक्षा आजच सहभागी व्हा !!! असो सर्वांना माझ्याकडुन हार्दिक शुभेच्छा !!!

आपला हा हाती घेतलेला उपक्रम खुप खुप मोठा होवो हिच प्रार्थना ..!!!



अभिषेक प्रभुदेसाई
अतिथी संपादक
इचलकरंजी

# “शुन्य”

आठवणीत गुरफ़टलेली रात्र
आणि लाचार दिवस. . .
यांच्या मध्ये निपचित पडलेलं असतं. . .
एक “शुन्य”. . .
एक असं शुन्य
ज्याला कोणतीही भुमिती टिचभर आकार देऊ शकत नाही,
कोणतही जीवशास्त्र जगण्याची ताकद देऊ शकत नाही,
आणि. . . . . .
कोणतही मानसशास्त्र न / स कारात्मक भाव
देऊ शकत नाही. . .
म्हणुन पर्याय नसतो त्याला निपचित पडून राहण्याशिवाय. . .
आणि. . . . . .
रात्रीच्या आठवणी आणि दिवसाची लाचारी लाचारपणे पाहण्याशिवाय
कारण याचसाठी निर्माण केलय त्याला
“ आणखी एका “देव” नामक शुन्यानं”

**अभिषेक मु प्रभुदेसाई**
इचलकरंजी

# “शुन्यात्मा”

लहर लहर
म्हणाली. . .
बहर बहर
तेव्हा माझी नजर
झाली जहर जहर
शुन्य आत्मा. . .!!
प्रश्नांचा कहर कहर
शुन्यात विरला. . .!!
पुन्हा तोच प्रहर
आसवांचे गाव कधीचे
झाले कैसे सशस्त्र शहर. . .?
एकांत उत्तर . .
एकच उत्तर. . .
आली शुन्यातुन
एकच खबर. . .!!
अशात जावे कसे नि कुठवर ?
अन शुन्यातच भिजलेली . . .
शुन्य झालेली . . .शुन्य नजर. . .
“शुन्यात्मा”

**मीनल चौगुले**
सांगली

# मी एक "शुन्य"

डोळ्यातुन पारा हळुच ओघळला. . .
नाव काय द्यायचं नात्याला जेव्हा प्रश्न आला . . .
नातं नाही दोघांत तरी भावना एकच आहे
जाणिवेने जपलेलं मन ते तर तुझंच आहे

खरं सांगु. . .?  ?खरचं काही कळत नाही
तुझ्याशिवाय मन कुठे रमत नाही
तु, तुझे विचार , तुझ्या अस्तित्वात
माझं अस्तित्व उरत का नाही ?

तु वेगळा. . . ,तुझं जग वेगळं. . .
त्यात मी कुठे रे ?
परत एकदा नको असलेला प्रश्न ?

आता जाणवायला लागलय. . .
मी एक "शुन्य"
ज्याचं मोल असुनही . . किंमत नसलेली
खरंच का रे मी एक "शुन्य"

**स्वाती देशमुख**
ठाणे

# “शुन्य महीमा”

एक टिंब एक शुन्य
वाढे शुन्य होई ब्रम्हांड
शुन्यातुनी आले अन
शुन्यची जहाले हे विश्व ।।

शुन्यासह ब्रम्हांड
शुन्याविन ब्रम्हांड
शुन्यवत ब्रम्हांड
शुन्य महिमा ।।

शुन्यासी किंमत
स्वतःची न काही
परी वाढवी मुल्य
शुन्य इतरांचे ।।

नवावरी शुन्य
होई नवकोट नारायण
जी परी सर्व इथेच सोडुन
होई अन एक महाशुन्य ।।

शुन्याने भागिले शुन्याला
जन्म अन अनंताचा जाहला
शुन्यातुन अनंत निर्मिला
असा शुन्याचा महिमा ।।

राधे विन कृष्ण शुन्य
कृष्णाविन राधा शुन्य
कृष्णासह राधा ब्रम्हांड
अन ब्रम्हांड एक “शुन्य” ।।

**सुनील जोशी**
पुणे

# "शुन्य"

लोकांसारखे चंद्रतारे तोडायला
मला कधी जमलेच नाही. . .
माझ्या चेह-यावरचे प्रश्नचिन्ह
मीच कधी काढलेच नाही. . .
का ? कुठे ? कधी ?कशाला?
ह्यात नुसता गुरफ़टत होतो
वादळातील पानांसारखाच
नुसताच भरकटत होतो
दिशाहिन . . ध्येयहीन. . .
होतो बस्स. . एक "शुन्य"
कसलीही किंमत नसलेला
होय तोच "शुन्य" मी. . .
जगाने नाकारलेला
तरीही गाळता न येणारा
जगत होतो आयुष्य
जगणं कसलं कुंठत होतो
रोजचा दिवस वजा करत होतो
आयुष्यातुन. . .
चला आजचा अजुन एक दिवस संपला
हा आनंद व्यक्त करत. . .
पण तरिही हे जिणं काय जिणं झालं नाही
मला माझं आयुष्य. . .
माझ्या त्या शुन्यापासुनच घडवायचयं
सगळं नवीन . . .
अगदी सगळं . . .
बाकी काही नको मला
बस. . .
हवी तुझी साथ मला
देशील. . . ?

**ओंकार तोरस्कर**
मुंबई

# “शुन्यापासुन शुन्याकडे”

धामधुम होते इथे
तुमचा जेव्हा जन्म होतो. . .
निष्पाप असता तेव्हा तुम्ही
याला मी शुन्य म्हणतो. . .

जेव्हा वाटते संपले सारे
मृत्यु जेव्हा जवळ असतो. . .
निष्पाप असता तेव्हाही
हा दुसरा शुन्य असतो. . .

धावाधाव सुरुच असते
तुमची , माझी , सर्वांची. . .
कोण जातो कुणाच्या पुढे
शुन्या पासुन. . . शुन्याकडे . . .

**आनंदा माने**
सोलापुर

# “वजाबाकी”

तु जीवनात आलीस अनं
बेरीज करुन मिळवत बसलो. . .
या मिळवणीच्या गणितात
कधी वजाबाकीच नाही शिकलो. . .

तु जीवनातुन वजा होताना
वजावट शिकवुन गेलीस . . .
फ़सवी माझी मिळकत
शुन्य शुन्य करुन गेलीस. . .

तु जीवनातुन वजा होताना
नयनी अश्रु साठवुन राहिली. . .
बेरीज - वजाबाकिच्या गणितात
तेवढ़ीच माझी बाकि राहिली. . .

चुकलेले हे गणित माझे
पुन्हा सोडवत नाही बसायचं. . .
को-या पाटिकडे बघत आता
तुझ्याशिवाय जगत रहायचं. . .

**सुरेश शिरोडकर**
मुंबई

# “शुन्य”

शुन्याची निर्मिती
शुन्यातुन निर्मिती ।।
शुन्य नाही तर
कसली गणती ।।

शुन्याची किंमत
शुन्याला किंमत ।।
शुन्य नाही तर
सगळे निरर्थक।।

शुन्याला जाणा
शुन्याला स्मरा ।।
एकेदिवशी नाहीतर
आपले अस्तित्वच विसरा ।।

शुन्यात जन्म
शुन्यात मरण ।।
शुन्याचं शाश्वत
कर शुन्याचे नामस्मरण ।।

मकरंद बेहेरे
मुंबई

# "टिंब . . टिंब . ."

एक शुन्य , दोन शुन्य
कितीही घ्या शुन्यावर शुन्य
बेरीज करा वा वजाबाकी करा
गुणाकार वा भागाकारही करा
राहिले तरी कसे फ़क्त शुन्य ?

टिंब . . टिंब . . टिंब . . टिंब . .
टिंब . . टिंब . . टिंब . . टिंब . .
जमा करा एकेक सारे टिंब . .
त्यातुन नवे निर्माण ब्रम्ह

. . . . .
टिंब . . टिंब . . टिंब . . टिंब . .!!!!

**डॉ. विजय बेकनाळकर**
मुंबई

# “शुन्य आहे मी”

अंधा-या खोलीत बसुन,
दिवसरात्र विचार करतो
जगलोच नाही जे त्या
आयुष्यावर लिखाण करतो

अपयश आले म्हणुन
संसार सारा मिथ्या म्हणतो
भंग होता प्रेम माझे
मोह माय म्हणतो

जीवनाच्या अनिश्चीततेवर
खरडलय बरंच काही
प्रगल्भतेचा आव आणुनी
उपदेश मात्र सांगत राही

बुडापासुन डोक्यापर्यंत
शुन्य आहे मी
अन लोक भेटुन म्हणतात
धन्य जाहलो आम्ही

शशांक प्रतापवार

# “शुन्याचा काळ”

जेव्हा रात्री जास्त जागतात
आणि पहाट लवकर उठते
तेव्हा मध्येच निपचित पडतो,
तो फ़क्त “ एका शुन्याचा” काळ

मग तो शुन्य पांघरुन घ्यायचा
अंगा खांद्यावर , डोक्यावर
आत शिरायचे त्याच्या
त्यालाच त्रिमीतिय बनवुन
आणि शिरलो त्या पोकळीत
किं आपणही निपचित पडायचं
त्याच्यासारखं . . निश्चिंत. . शांत
काळाला मागे टाकत . . .

हर्षदा विनया

# “शुन्य आभाळ”

क्षण गेले कुण्या गावा
त्याच गावचे ते झाले
किती शोधु मी प्रियेला
आता थकली पावले ।।

प्रित जगाने तोडली
परी आस ना सोडली
अट जगाची मानुनी
सारे घाव मी सोशिले ।।

हेचि आले मोल तपा
झाला सैरभैर खोपा
काडी काडी जोडताना
घोट आसवांचे प्याले ।।

दैव आघात करता
डाव माझा मी हरता
पक्षी गेला दिगंतरा
शुन्य आभाळ हे झाले ।।

जरी मोकळे आभाळ
जेव्हा होईल सकाळ
उडतील पुन्हा पक्षी
पुन्हा डोलतील फुले ।।

**स्वर्गीय अहं ब्रम्हास्मी**

# "बाकी शुन्य"

कर कर – करायचं
मर मर - मरायचं
उन्हात घर बांधायचं
वादळ अफ़ाट
छप्पर सपाट. . .उरलं काय ?
बाकी शुन्य ।।

वार चार – झेलायचे
डोंगर दुः ख – पेलायचे
डोंगर सरेल
हिरवळ उरेल . . बाकी काय?
बाकी शुन्य ।।

भरधाव घाव – घालायचे
दाती ओठ – दाबायचे
चिडचिड बंद
ज्वाळा थंड . . उरलं काय ?
बाकी शुन्य ।।

देव देव - मंदिरात
ठेव ठेव – पैसे सात
नारळ फ़ोड
नशिब खोड. . शेवट काय ?
बाकी शुन्य ।।

जग जग – जगायचं
भोग भोग - भोगायचं
जगाल किती
भोगाल काय ... उरेल काय ?
बाकी शुन्य ।।

घोर घोर जीवाला
दोर दोर – छताला
सटकला काय
लटकला काय . . . झुलतय काय ?
बाकी शुन्य ।।

धरुन पोट - हसायचं
काळीज ओतुन - रडायचं
हसेल सोबत
रडेल कुणी. . उरलय काय ?
बाकी शुन्य ।।

लिह लिह- लिहायचं
वाह वाह – ऐकायचं
शाई जिरेल
वाहाई विरेल. . आणि काय ?
बाकी शुन्य ।।

धाव धाव – धावत रहा
चाल चाल - भोती पहा
असेल पडला
कुणी एकला
आधार दे . . पुरचुंडीत काय ?
तेवढंच पुण्य ।।।।
बाकी . . ?
बाकी “०”

**प्राजक्त देशमुख**
नाशिक

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरीने १००चा पल्ला गाठला. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

